मे. मास्टेक लि. यांचेसोबत संगणक प्रणाली विकसित करणेबाबतच्या करारास मुदतवाढ देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## विधि व न्याय विभाग

**शासन निर्णय क्रमांक : सीएचसी १११९/२९३/(१३२/१९)/कार्या-१७.**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०६ डिसेंबर, २०१९

वाचा:- धर्मादाय आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र. ५६४९/२०१९ दि. २९.११.२०१९ .

**प्रस्तावना :**

धर्मादाय संघटनेतील संगणक प्रणाली विकसित करणेकरिता धर्मादाय संघटनेने आर.एफ.पी. प्रसिद्ध केलेली होती. त्यातील अटी व शर्तीनुसार निविदा प्रक्रिया पार पाडून मे. मास्टेक ली. यांना संगणक प्रणाली विकसित करणेबाबत कंत्राट देण्यात आले होते. मे. मास्टेक कंपनी सोबतच्या कराराची मुदत दि. ११ नोव्हेंबर २०१९ रोजी समाप्त झाली आहे. सदर करारातील अटी व शर्तींवर ३ महिन्याकरिता म्हणजेच दि. १४.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत व करारातील अटी व शर्तींनुसार सदर मुदतवाढीसाठी येणारा खर्च रु. ४,३२,३००/- इतका असून सदर खर्च सार्वजनिक न्यास प्रशासन निधीमधून खर्च करण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव वाचा येथील दि. २९.११.२०१९ च्या पत्रान्वये सादर करण्यात आला आहे. त्यानुसार सदर करारास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

मे. मास्टेक ली. यांचेसोबत संगणक प्रणाली विकसित करणेबाबतच्या कराराची मुदत दि. ११ नोव्हेंबर २०१९ रोजी समाप्त झाली आहे. सदर प्रकरणी मे. मास्टेक ली. यांना सदर काम नव्या कंपनीकडे सोपविण्यासाठी किमान१ महिन्याची मुदत आवश्यक आहे असे धर्मादाय आयुक्त कार्यालयाकडून कळविण्यात आले आहे, त्यामुळे मुदतवाढ देणे आवश्यक आहे. मे. मास्टेक ली. यांचेसोबत झालेल्या करारामध्ये कलम ३ नुसार कराराच्या मुदतीनंतर एक वर्षापर्यंत मुदत वाढविण्याचा अधिकार आहे. त्यानुसार सदर करारातील अटी व शर्तींवर ३ महिन्याकरिता म्हणजेच दिनांक १४.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यास व करारातील अटी व शर्तींनुसार सदर मुदतवाढीसाठीखालीलप्रमाणे रु. ४,३२,३००/- (अक्षरी रुपये चार लाख बत्तीस हजार तीनशे फक्त) + प्रचलित कर (GST) इतकी रक्कम सार्वजनिक न्यास प्रशासन निधीमधून खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| | **Rate for 3rd AMC year in INR/Month (Rs.)** | **Total cost in INR for 3 months (Rs.)** |
|---|---|---|
| Project Manager | 1,10,000/- | 3,30,000/- |
| Help Desk Co-ordinator | 34,100/- | 1,02,300/- |
| | Total | 4,32,300 |

२. हा शासन निर्णय मुंबई सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियम मधील कलम ६० (१) अन्वये व शासन निर्णय, क्रमांक - सीएचसी-१११७/४६/(१९/१७)/का.१७ , दि. १० एप्रिल, २०१७ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार प्रधान सचिव व विधि परामर्शी यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२०६१२४७५०१५१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kamini R Pilankar

Digitally signed by Kamini R Pilankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bd66db73425a9730e4074ae475eb26788ae32a45d13639a02fcf2ffbd43272ff, serialNumber=791d70f75a8bfaa8349786f02d71cad4fb9d1999ea0d92d63dcf5de198d4f817, cn=Kamini R Pilankar
Date: 2019.12.07 17:12:38 +05'30'

( का. रा. पिळणकर )
कार्यासन अधिकारी

**प्रति-**

१. प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव व विधि परामर्शी , मंत्रालय, मुंबई .
३. धर्मादाय आयुक्त, धर्मादाय आयुक्त कार्यालय, डॉ.ॲनी बेझंट रोड, वरळी, मुंबई.
४. सर्व धर्मादाय सहआयुक्त /सहायक धर्मादाय आयुक्त, धर्मादाय संघटनेतील सर्व जिल्हास्तरीय कार्यालये ( धर्मादाय आयुक्त, धर्मादाय आयुक्त कार्यालय, डॉ.ॲनी बेझंट रोड, वरळी, मुंबई. यांचेमार्फत )
५. मे. मास्टेक ली. ( धर्मादाय आयुक्त, धर्मादाय आयुक्त कार्यालय, डॉ.ॲनी बेझंट रोड, वरळी, मुंबई. यांचेमार्फत ).
६. कार्यासन १७-संग्रहार्थ.